**महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः परिवि-२०२१/प्र.क्र.२८९ /सेवा-३**
दहावा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय,मुंबई- ४०० ००१.
तारीख: ०६ डिसेंबर, २०२१.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवी-२७१५/प्र.क्र.३०२/आठ, दिनांक २९ फेब्रुवारी, २०१६.
२) शासन शुध्दिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांकः परिवी-२७१८/प्र.क्र.२/आठ, दिनांक ०७ फेब्रुवारी, २०१८.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" या पदावर दोन वर्षाच्या परिविक्षा कालावधीकरीता खालील तक्त्यात नमूद वैद्यकीय अधिकाऱ्यांची नियुक्ती करण्यात आलेली आहे. सदर नियुक्त्या सन २०११ मध्ये स्वतंत्र निवड मंडळाने महाराष्ट्र ज्ञान महामंडळामार्फ़त केलेल्या शिफारशीनुसार "वैद्यकीय अधिकारी गट-अ"या पदावर शासन सेवेत प्रथम नियुक्तीने करण्यात आलेली आहे.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या वाचा येथील शासन निर्णयान्वये शासन सेवेतील अधिकारी/ कर्मचारी यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याबाबत सुधारित मार्गदर्शक सूचना पारित करण्यात आल्या असून,वैद्यकीय अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा, गट-अ या पदावर पदस्थापना दिलेल्या अधिकाऱ्यांनी त्यांचा दोन वर्षांचा परिविक्षाधीन कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेला असल्याने या अधिकाऱ्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती विचारात घेता सदर परिच्छेदात नमूद तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा या संवर्गातील खालील "वैद्यकीय अधिकारी गट-अ" यांनी त्यांचा परिविक्षाधीन कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणाऱ्या बाबी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या असल्याने त्यांचा परिविक्षाधीन कालावधी त्या तक्त्यातील त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या स्तंभ क्र.५ मध्ये नमूद दिनांकास (म.नं.) समाप्त करण्यात येत आहे.तसेच त्यांची सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक स्तंभ क्र.७ मध्ये नमूद करण्यात येत आहे.

| अ. क्र. | नाव | कार्यालय | वै.अ.पदावरील रुजू दिनांक | परिविक्षाधीन कालावधी समाप्त केल्याचा दिनांक | परिविक्षाधीन कालावधी पुढे ढकलल्याची कारणे | वै.अ.पदावरील सेवा नियमितपणे पुढे चालू ठेवण्याचा दिनांक |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| २ | डॉ. रोहन अशोक झाडे | ग्रामीण रुग्णालय रजेगाव, जि.गोंदिया | दि.३०.०५.२०११ | दि.०४.०७.२०१३ | ३६ दिवस रजा | दि.०५.०७.२०१३ |

२. आयुक्त, आरोग्य सेवा व कु.क.तथा अभियान संचालक, रा.आ.अ., मुंबई यांना कळविण्यात येते की, उक्त वैद्यकीय अधिकारी यांच्या वेतनवाढी नियमानुसार मुक्त करण्याच्या अनुषंगाने तात्काळ उचित कार्यवाही करावी.

३. डॉ. रोहन अशोक झाडे यांना भाषा संचालनालयाची हिंदी भाषा उत्तीर्ण होण्यापासून जुलै,२०१५ पासून सूट मिळालेली आहे. तथापि, त्या तक्त्यात त्यांच्या नावापुढील स्तंभ क्र.५ मध्ये नमूद केल्यानुसार जरी त्यांचा परिविक्षा कालावधी दि.०४.०७.२०१३ रोजी समाप्त होवून स्तंभ क्र.७ येथे नमूद केल्यानुसार त्यांची वैद्यकीय अधिकारी त्या पदावरील सेवा नियमितरित्या जरी दि.०५.०७.२०१३ पासून पुढे चालू होत असली तरी, त्यांच्या वेतनवाढी जुलै,२०१५ पर्यंत रोखून त्या दिनांकापासून त्यांना वेतनवाढी देय होईल व पुढील सर्व वेतनवाढी त्यांची कोणतीही वेतनवाढ रोखून धरण्यात आली नव्हती असे मानून त्यांना मिळतील. मात्र वेतनवाढ रोखल्यामुळे त्यांना ज्या प्रत्यक्ष वेतनास मुकावे लागेल त्याची थकबाकी मिळण्याचा हक्क त्यांना राहणार नाही.तसेच डॉ. रोहन अशोक झाडे यांची वैद्यकीय अधिकारी या पदावर दि.१९.०१.२०११ च्या शासननिर्णयान्वये प्रथम नियुक्ती झालेली असली तरी त्या शासननिर्णयातील अटी, शर्ती व तरतुदीनुसार ते त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी विहित वेळेत एक महिन्याच्या आत म्हणजे दि.१८.०२.२०११ पुर्वी रुजू होणे क्रमप्राप्त होते. तथापि, ते दि.३०.०५.२०११ या दिनांकास वैद्यकीय अधिकारी या पदावर प्रथम नियुक्तीने उशीराने रुजू झालेल्या आहेत. सबब डॉ. झाडे यांची ज्येष्ठता बाधित होणार असुन ते त्यांची मूळ ज्येष्ठता गमाविल्यामुळे त्यांची ज्येष्ठता त्यांच्या नियुक्ती आदेशानुसार ग्राह्य न धरता त्यांच्या रुजू दिनांकापासून ग्राह्य धरण्यात येत आहे.

४. सदर शासन आदेश संदर्भाधिन येथे नमूद शासन निर्णय/शुध्दीपत्रक यांमधील तरतुदींन्वये व सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय परिवी-२७१५/प्र.क्र.२०३/आठ, दिनांक २५ ऑगस्ट, २०१५ अन्वये प्रशासकीय विभाग प्रमुखास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२०६१११९२५४३१७ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO

Digitally signed by LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=047af7706d4845170e3864b62c8bc6b380c78f11ce6607746c0b15e934fc8284, pseudonym=91CF303CCF98AAFBC28FD87C6A71DA717A6A7250, serialNumber=8902AEDC74F3CACF3FB967FF5955AAF5DCBFDD2C053872C04B5E4671EF77EC30, cn=LAHANE VIJAYKUMAR LAXMANRAO
Date: 2021.12.06 11:36:13 +05'30'

**( वि. ल. लहाने )**
**शासनाचे सह सचिव.**

**प्रति,**

१. आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.

२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- १, महाराष्ट्र, मुंबई.

३. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)- २, महाराष्ट्र, नागपूर.

४. महालेखापाल, लेखापरीक्षा- १, महाराष्ट्र, मुंबई.

५. महालेखापाल, लेखापरीक्षा- २, महाराष्ट्र, नागपूर.

६. संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, आरोग्य भवन, मुंबई.

७. उपसंचालक, आरोग्य सेवा मंडळ (अकोला).

८. जिल्हा शल्य चिकित्सक गोंदिया

९. जिल्हा आरोग्य अधिकारी,जिल्हा परिषद गोंदिया

१०. जिल्हा कोषागार अधिकारी गोंदिया

११. संबंधित वैद्यकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्यामार्फत.

१२. निवडनस्ती (कार्यासन, सेवा-३).